साहित्य प्रतिष्ठान

वर्ष तिसरे, अंक २२

नेटअक्षरी

लोग न जाने कैसे उम्रभर की दुश्मनी कर लेते है ?
हमें तो मोहब्बत के लिये एक जिंदगी कम लगती है..






हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी व सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी - netaksharee@gmail.com



# संपादकीय

तो मनात येईल तसं वागणारा तर ती त्याच्या मनाचा मान राखून वागणारी.
तो स्वतःचंच म्हणणं खरं करणारा तर ती खरेपणाने वागणारी.
तो लाख शब्दांतूनही अव्यक्त तर ती एका अश्रुतूनही बोलून जाणारी.
तो कधी चांगला तर कधी वाईट आणि ती कधी चांगली तर कधी खुप चांगली.
तो तिचा कुणीच नाही तर तिच्यासाठी तो सर्वस्व.
असं तो आणि ती चं नाजुक आणि अजबगजब नातं.आपुलकीच्या धाग्यांनी विणलेलं पण अनिश्चिततेच्या वादळाने घेरलेलं.
अशा ह्या नात्यात तो आणि ती प्रियकर प्रेयसी असू शकतात किंवा एकमेकांचे प्रियजन,दोस्तं किंवा नातलगही.
ह्या गहन नात्याच्या डोहामध्ये नेहमीच भावनांचे तरंग उमटत राहतात आणि गैरसमजाची गढुळताही येत राहते.
पण ह्या सर्वात एक गोष्ट मात्र कायम असते..तिचं त्याच्यासाठी समर्पित असणं अन त्याचं भलं इच्छिणं.
निर्विवाद तोही चांगलाच असतो पण...पण तो कमी पडतो ते तिला समजून घेण्यात.
म्हणून तिचं त्याला एकच निर्वाणीचं सांगणं..

असं किती आहे आयुष्य ?
अर्ध तुझी वाट पहाण्यात गेलं
आणि
आत्ता येतो आहेस तर
गैरसमजाच्या भिंतीत चेचून अर्धही निघून जाईल
मला फक्त तुझा एक क्षण हवाय
तो उमलू दे अन मिटू दे हे आयुष्य..खुश्शाल

**नेटाक्षरीचा हा अंक आधारित आहे ह्याच ‘तो’ आणि ‘ती’ च्या नात्यावर**

## ह्या अंकात वाचा

तो आणि ती -

भावनांच्या गूढ डोहावर नागपूरच्या भावना कुमरेचे शब्दंतरंग

भावनांचा हिंदोळा -

तो आणि ती चे नाते उलगडवणाऱ्या तरल कविता

# अतिथी संपादकीय – 'तो' आणि 'ती'

'तो' आणि 'ती'..नुसते शब्दं जरी कानावर पडले तरी मनात एकच काहुर माजतो.एक अनामिक गोंधळ उडतो.एक असं नातं जे शब्दांपलीकडचं असतं.ह्या शब्दांपलीकडच्या नात्यालाच शब्दंरुप देण्याचा माझा हा प्रयत्न.

तो आणि ती चं नेमकं नातं काय हेच उमजत नाही पण,ह्या तो आणि ती च्या नाते जपण्याच्या संघर्षात प्रत्येक ती ला मात्र मी सदैव झुरतांना पाहिलंय.समाजाचा,स्वतःचा अथवा इतर कसल्याही गोष्टीचा विचार न करता बहुतेक मुलींना मी त्याच्या पाठीशी उभं असलेलं पाहिलंय.मग,इथं हा तो प्रियकर असो वा मित्र.ती नेहमीच त्याच्यासाठी तत्पर असते.तो देखील बहुतेक वेळा तिच्या सुखदुःखात सहभागी होतो.पण,सुख दुःखाच्या भागीदारीच्या या स्पर्धेत तो ती ची बरोबरी करुच शकत नाही.म्हणूनच तर ही ती आई असो,बहीण,प्रेयसी,मैत्रीण किंवा इतर कुठल्या दुसऱ्या रुपात.'ती'ला मायाळू,दयाळू आणि प्रेमळंच संबोधलं जातं.

तो तीच्या आयुष्यात येतो ते नक्कीच काटेरी कुंपणात जगत असणाऱ्या ती ला बाहेर काढण्यासाठी.ती चंचल पण शांत.बोलकी पण अबोल.नियतीने तिच्याकडून खुप काही हिसकावून घेतलेलं.ती हताश,दुःखी,एकटी असतांना तो तिच्या आयुष्यात येतो.तिला जगण्याची दिशा दाखवतो,हसण्याची कला शिकवतो.आयुष्यात काहीतरी भव्य करुन दाखवण्याची जिद्दसुद्धा ती त्याच्याकडूनच शिकते.कळतनकळत तिला त्याच्यापासून भरपूर काही शिकायला मिळतं.तिच्या आयुष्यात बहार येते.ती परत जगायला लागते.खऱ्या अर्थाने ती त्याच्या सोबतीने जगणं,हसणं,मुक्तपणे वावरणं शिकते.दोघांच्या मैत्रीला बहर येतो.

तसं दोघांचं नातंसुध्दा निराळंच.जगाला समजण्या पलीकडचं..मैत्रीचं नातं.आणि मैत्रीही अशी की पाहून इतरांना हेवा वाटावा.तो तिच्या आयुष्यात येतो,ती त्याला देवाचं वरदान समजते.जसं मृत्यूशय्येत पडलेल्याला अमृताचं वरदान.त्याचं तिच्या आयुष्यात असणं म्हणजेच अमृताचा सागर फक्त तिच्या मालकीचा असणं.तो तिच्यासाठी खुप काही करतो.ती देखील निःस्वार्थपणे त्याला सर्व काही देत जाते.जेव्हा जेव्हा त्याला तिची गरज भासते,ती कसलीही तमा न बाळगता त्याच्या मदतीला धावून जाते.तो जितकं तिला देतो ती त्याहून दुप्पट त्याला देण्याचा प्रयत्न करते.आणि,ह्या देण्याच्या नादात ती आपले सर्वस्व त्याला दान करुन जाते.मात्र,एकटयात मात्र ती च रडत बसते.तिची अपेक्षा फक्त एवढीच की तो सदैव तिचा मित्र असावा,तिच्यासोबत असावा.तो सदा आनंदी असावा,सुखी असावा.त्याचे सगळे दुःख ती आपल्या पदरात मागून घेते.

पण दुर्दैवाने,एक दिवस असा उगवतो की त्यांच्या मैत्रीत दुरावा निर्माण होतो.तो तिला स्वार्थी म्हणतो.ती निमूटपणे ऐकून घेते.तिच्या मनात एकच प्रश्न निर्माण होतो..स्वार्थी आणि मी ? ज्याच्यासाठी ती झटते,झुरते,ज्याच्या प्रत्येक प्रश्नाचं ती उत्तर बनण्याचा प्रयत्न करते,ज्याच्यापुढे ती सर्वस्व स्वाहा करते,ज्याने तिला जितकं दिलं त्याच्या दुप्पट देण्याचा ती प्रयत्न करते..अशी ती स्वार्थी ? कशी ? ती म्हणते,जाऊ देत..तो माझा आहे.हक्क आहे त्याला मला बोलण्याचा,आपला राग रुसवा-फुगवा माझ्यावर काढण्याचा.यालाच तर खरी मैत्री म्हणतात.तो बोलेल ती ऐकेल.त्याचं मन राखून त्याच्या शब्दांना आपलंसं करेल.पण तरीही ती मनातनं एकच प्रश्न विचारेल,सांग ना रे वेड्या,मी स्वार्थी कशी ? तो वादाचं वादळ निर्माण करतो.कारण त्याला आता तिच्यापासून दूर जायचं असतं.त्याला गमावण्याच्या भीतीनं ती निर्लज्ज बनते.मला सोडू नकोस अशी भीक मागते.तिला तो हवाय फक्त खरा मित्र म्हणून.तिला जगायचंय.त्याची मैत्री हवी.तिला जग जिंकायचंय.त्याची सोबत हवी.तिला त्याच्याकडून मैत्रीपलीकडच्या नात्याची अपेक्षा नाही,पण मैत्रीचा हक्क ती मागते.तिला तो हवाय मार्गदर्शक म्हणून.त्याने दिशा दाखवावी.तिच्या चुकांवर टीकास्त्र सोडावं.पण तो तिला टाळतो.तिचं मन मोडतो.आता त्याला तिच्या अश्रूंची किंमत नसते.कधीकाळी त्याच्यासाठी त्याची आवडती मीनाकुमारी असणारी ती त्याला नकोशी होऊन जाते.त्याच्या क्रूर,निष्ठूर वागण्याचं गूढ खुप प्रयत्न करुनही तिला समजू शकत नाही.दुराव्याची ही दरी रुंदावत जाते.पण तरीही ती मात्र मैत्री टिकवण्याचा निरंतर प्रयत्न करत राहते.

आणि,परत तेच काटेरी कुंपण,अश्रूंच्या सागरात पोहणं,विचारचक्राच्या जाळ्यात गुंतणं.समाजासोबत चालायचं.लोकांच्या गर्दीत मात्र नेहमी स्वतःला एकटं असलेलं बघायचं.मनात एकच प्रश्न..तो असं का वागला?आणि तो परत येईल म्हणून तिनं निरंतर वाट बघत राहायचं अन आयुष्य तिचं परत स्वप्नील व्हायचं.तोच तिचा आत्मविश्वास आहे,उत्साह आहे,तिची प्रेरणा आहे,तोच मार्ग आणि दिशा,तोच मती आणि गतीदेखील आहे.हे त्याला कधी समजायचं ?तिच्या भावनांची जाणीव त्याला कधी व्हायची ? आणि अशा वेदनांच्या तुरुंगवासाची शिक्षा फक्त तिनेच भोगायची....

समाजात वावरतांना आपल्या अवतीभवती आपल्याला असे अनेक 'तो' आणि 'ती' दिसतात.आणि ह्या तो आणि तीच्या नात्यात 'ती' लाच वेदनांत,अश्रूंच्या महासागरात बुडत असतांना मी पाहिलंय.इथे ह्या अशा प्रत्येक 'ती' च्या मनातील भावना,अनुभव मांडण्याचा मी प्रामाणिक प्रयत्न केला आहे.

तशी,मी 'लिहायचे' पण गुपचूप,लपूनछपून.आपल्या लिहलेल्या कविता मी कधीच कुणाला दाखवल्या नाहीत की ऐकवल्या नाहीत.का कुणास ठाऊक ?तसं माझ्यात उत्तम कविता लिहण्याची कला नाही अथवा तसा छंददेखील नाही.पण तरीही अधूनमधून काहीतरी लिहणं चालूच असतं.हातात पेन आला की उगाच काही सुचू लागतं आणि कागदावरचं निरभ्र आकाश मग निळंभोर व्हायला लागतं.आणि त्या आकाशात उडण्यासाठी माझ्या लेखणीला पंख फुटू लागतात.खरंतर स्वप्नानेच माझ्यातली कवयित्री जागृत केली,मला लिहीत राहण्याची प्रेरणा दिली.म्हणून आता,हा श्वास नवा नवी भरारी मनी भावनांची मुक्त मनोरी.

जगभरात विखुरलेल्या मराठी माणसांना जोडणाऱ्या नेटाक्षरीने नुकताच आपला शतकोत्सवी अंक प्रकाशित केला आहे.त्या अंकातला नेटाक्षरीचा प्रवास व संपादक मंडळाची ओळख,मनोगतं वाचून थक्कं व्हायला होतं.अशा बहुप्रिय नेटाक्षरीच्या अतिथी संपादकपदाचा बहुमान मला दिल्याबद्दल ई साहित्य प्रतिष्ठानचे मी मनःपूर्वक आभार मानते व पुढील वाटचालीसाठी अनेकानेक शुभेच्छा देते.




अतिथी संपादिकेची ओळख –

भावना कुमरे.

Graduate in Gemologist Jewelry Designing.

नागपूरमध्ये एका सुप्रसिद्ध कंपनीत design consultant म्हणून कार्यरत.

# भावनांचा हिंदोळा

*नक्की कोण तू माझा ?*

मित्रापेक्षा जास्त आणि प्रियकरापेक्षा कमी
नाही...तोलत नाहीये मी ही अनमोल नाती
पण आहेस तरी नक्की कोण तू माझा ?
अवचित या मोहक वळणावर भेटलेला
गुंफलेस तू धागे विश्वासाचे
देतो आहेस साथ पाळून निती नियम जगाचे
केवढी आहे आपली दोस्तांची फौज
तरी कुणातही नाही अजूनही कुजबूज
पण ठाऊक आहे दोघांना
आवडतो आपण एकमेकांना

घेतो दुःख वाटून,अडचणी समजून
नाही दुखवत भावनांना
पाठराखण करतो एकमेकांची
ना ओढ आहे ही,ना आकर्षण
ना दिले आहे मन एकमेकांना आंदण
पण,बोलायला लागले आहेत डोळे
मैत्रीच्या वाटेवर फुलताहेत प्रेमाची फुले
काय आहे तुझ्या मनात ?
जरा बोल तरी शब्दांत
खुप झालाय मजेशीर हा गुंता
व्हायलाच हवा आता उलगडा
होईल का ह्या नात्याची उकल ?
एक मात्र जरुर कर
मित्र रहाच बनलास जरी प्रियकर
कारण,
आपल्या मैत्रीचे नातेच तर आहे खरे अमर

*- स्वप्ना कोल्हे (नाशिक)*




मी गृहितच

गोंधळ
माझ्याही मनात
नेहमीच
तुझ्याबद्दल,माझ्याबद्दल

गोंधळ
तुझ्याही मनात
नेहमीच
स्वतःबद्दल

मी गृहितच

- अमरा (रत्नागिरी)

# सखा

त्यादिवशी अचानक ऐकलेलं गाणं
मोसे छल किये जाये,सैय्या बेईमान
नकळत मनात झालेली तुलना सख्याशी
सखा ! ह्या जगातलं सर्वात सुंदर नातं
या सख्याला काही सांगावं लागत नाही
माझ्या मनातलं कधीच पोचलेलं असतं
त्याच्या मनापर्यंत नकळत

सख्याचं येणंही अवचित न कळवता
वाऱ्यावर येणाऱ्या मृदगंधासारखं
मग शब्दं अडतात ओठातच
आणि सारा संवाद नजरेनेच
माझा सखा फक्त माझा असतो
कमीतकमी माझ्यासोबत असतांना तरी
ते क्षण असतील कदाचित चार दोनही
पण लाघवी,जपलेले बकुळ सुगंधी
कधी कदंब तरुचा रेखीव पार
तर कधी वनातली निवांत जागा
हातातली सानिका मात्र कायम
कधी कधी हेवा वाटतो तिचा

सखा ! सगळे हट्टही पुरे करतो
मागावं कधी लागतच नाही
कधी सायली,कधी जाई जुई
तर कधी हक्कानं मागितलेलं मोरपीसही
इतकं सगळं सुंदर सुंदर असूनही
राग येतो सख्याचा मग रुसवा
केलेली मनधरणी,रंगलेला राससोहळा
आणि भान हरपलेली मी राधिका
राजस सखा,झळाळते नील गगन
तेजोमय पूर्ण चंद्र आणि कालिंदी तट
तरीही हुरहूर वाटतेच अवचित
भिती नाही वाटत मनात पण
थोडीशी ईर्ष्या नंदपुरीतल्या गोपिकांची



- सोनाली घाटपांडे (पुणे)



साथ

आली जर तुझ्या दारात
प्रितीची चार फुले ओंजळीत
प्रेमाची भीक घालशील का ?

नाही झाला तनाने
पण मनाने माझा होशील का ?

दिलेय मन मी तुला
मागे वळून पाहशील का ?

नाही आला घरी
तरीपण दारातून एकदा जाशील का ?

झोपलेले माझे नयन
तुझ्या स्वप्नांनी जागे ठेवशील का ?

हातात हात घेतला आहेस माझा
जन्मभर साथ मला देशील का ?

- अनुजा पालेकर (मुंबई)



*सखा आणि सखी*

फुल हातात घेतांना काटे कधी रुतले कळलेच नाही
हसता हसता अचानक
आसवे कशी गळाली कळलेच नाही

आता मात्र काळजीपूर्वक पाऊले आपण उचलुया
सुखाबरोबरच दुःखाचाही विचार आपण करुया

क्षणिक सुखाला कवडीची नसते किंमत
पण ते वेदना देऊन जाते हजारपट

म्हणूनच सांगते,राजसा
आता नको काही
बनून राहुया फक्त
सखा आणि सखी

*- कल्याणी शिंपी (ठाणे)*

## असे कधी न घडावे

तू माझा झाला
तुझा ध्यास जीवाला
जरी बोलले मी
तू स्वार्थ समजला

न झाला एकनिष्ठ
न नाते तू जोडले
अदृश्य साखळीला
कसे तू तोडले

साधली जवळीक
गुंतवले न मन तू
जिंकलास खरा
फसलास पण तू

जाशील निघून
मला खंत नाही
तुझ्या आठवांना
परी अंत नाही

तुला स्मरण कुणाचे
कधी न छळावे
तुझ्या आयुष्यात
असे कधी न घडावे

तुझ्या आयुष्यात
असे कधी न घडावे

- प्रिया गवई (नागपूर)



## जमेल का तुला ?

गेलास ना न सांगताच
सगळं काही अर्धवट सोडून
ते रंग,ते चित्र आणि ते मन सुध्दा
अगदी तसंच पडलंय तू सोडून गेलेलास जिथे

येतांना कित्ती आर्जवं केलेलीस ना
नको नको म्हणतांना सुध्दा
शेवटी आलासंच ना ह्या मनात
अगदी कोरंकरकरीत होतं ते
तुझ्या कॅन्व्हास सारखं
घेऊन आलास एकेक रंग
काही गहिरे काही पुसटसे
भिरकावलेस त्या कोऱ्या मनावर
मग तुझ्या त्या रंगांचा मोह मलाही नाही आवरला
चित्रं बनवलीत आपल्या प्रेमाची,स्वप्नांची
मीच माझ्या मनावर
विसरलेले की ते रंग तू आणलेलेस
विसरलेले की चित्र बनवायला तू शिकवलेलेस

आणि आता मात्र
निघून गेलास तू
रंग तसेच पडलेत
चित्रंही अर्धीच राहिलीत रे
एकदा येऊन जा ना
अंहं नाही
चित्र पूर्ण करायला नाहीत
रंगांचा पसाराही आवरायला नाही
ते रंग पुसून टाकायला
तेवढं मात्र नाही रे शिकवलंस तू
बघ जमतंय का तुला
देऊ शकशील का ?
माझं मन मला परत ?
जसं होतं तसं कोरकरकरीत ?
जमेल का तुला ?



- भारती सरमळकर (मुंबई)

## तू,मी आणि आपली मैत्री

मैत्री ४ दिवसांचीच हेच पटवलंयस मला
४ क्षणांचं भेटणं आता नकोसं झालंय तुला
अनंत काळचा विरह चालणार आहे तुला

का ? का आज असा झालास ?
मैत्रीचं बंधनही बंधन वाटू लागलं तुला
का नाही कळत तुला
मैत्री तर खुप छान भेट असते रे
तेच तर हक्काचं माहेर असतं, पहिली पायरी असते
पाय पसरुन विसावण्याची
का नाही उमगत तुला
ते प्राजक्ताचं फुल नसतं
रात्री उमलून सकाळी बावणारं
मैत्री तर सूर्यफुल
तुला पहाताच रसरसून फुलणारं

मग का ? काय झालंय असं ?
की हातात हात घेऊन चालतांना
आज तुला तू आठवायला लागला ?
का असं झालं ?
एक मन असूनही आपण वेगळे झालोत
का आज तू माझ्यासोबत नाहीस
मला जवळ घ्यायला
का आज तू नाहीस माझ्यावर रागवायला
माझ्यावर भांडायला ?
का आज जाणवतंय
की एकत्र चालणारे आपण समांतर चालतोय
बस चालतोय....तूही अन मीही
माहित आहे तुला ?
समांतर रेषा कधीच एक होत नसतात रे
तसंच काहीसं आता तुझं नी माझं



- स्वाती उर्फ श्वेता देशमुख (ठाणे)



मराठी साहित्य रसिकांना नेहमी उत्तमोत्तम व नाविन्यपूर्ण साहित्य पुरवण्याचा ई साहित्य प्रतिष्ठानचा ध्यास नेटाक्षरी जोमाने पार पाडत आहे.दरवेळी ईमेलने येणाऱ्या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह उधाणतो.ह्याच प्रोत्साहनाच्या बळावर नेटाक्षरीने मागील महिन्यातच आपला शतकोत्सव साजरा केला.हा अंक सध्या सुमारे ८५००० रसिकांना ईमेलने मोफत वितरीत केला जातोय.सोबतच मागील सर्व प्रकाशित अंक वाचण्यासाठी www.esahity.com ह्या आमच्या संकेतस्थळाला भेट देणाऱ्यांची संख्याही लक्षणीय आहे.हे अंक तुम्ही आपल्या फ्रेंडलिस्टला Fwd करुन त्यांनाही ह्या आनंदयात्रेत सहभागी करुन घ्यावे हा आमचा प्रेमळ आग्रह.त्याच ईमेलची cc netaksharee@gmail.com वर आम्हाला दिल्यास पुढील अंक आम्ही त्यांना नियमित पाठवत राहू.मराठी भाषेची लोकप्रियता दिवसेंदिवस वाढत जाण्यास आपला हातभार लागावा असे कुठल्या मराठी भाषिकास नाही वाटणार ? ह्याच विश्वासाच्या बळावर आपल्यासारख्या दर्दी रसिकांच्या सहाय्याने नेटाक्षरी लवकरच लाखाचाही पल्ला पार करील अशी आम्हांला खात्री आहे.

*आमची इतर ई प्रकाशने –*

विनोदाचा दादा-ई स्टॉप,कवितांचा आवाज-स्वर नेटाक्षरी
मुलांचा नेट प्रवेश-बाल नेटाक्षरी,महाराष्ट्राचं वैभव-दुर्ग दुर्गट भारी

*आमची प्रकाशित ई पुस्तके –*

टल्लीची शाळा,मकरंदच्या त्रिवेण्या,ग्रेव्हयार्ड लिटरेचर,
चार क्षण,तो आणि ती,प्रियेचे अभंग,देशी दारुचे दुकान,
ई शाळा,तो मी आणि सिगरेट,मोरया,
लोकल गोष्टी,मीरा(मराठी अनुवाद),ओथंब,
सावळ्या मुलीची गाणी,सईची वही

वरील ई पुस्तके मोफत मिळण्यासाठी,सूचना,अभिप्राय,प्रतिक्रिया,
स्वलिखित साहित्य पाठवण्यासाठी – www.esahity.com

नेटाक्षरी हा विनामुल्य अंक नियमित
मिळण्यासाठी,सूचना,अभिप्राय, प्रतिक्रियांसाठी -
netaksharee@gmail.com

ई साहित्यची सर्व प्रकाशने cd मध्ये देखील उपलब्ध आहेत.
संपर्क करा – ९८६९६७४८२०